नियमित निवडसूची २०२४-२५:
**"पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान विभाग"** *[पूर्वीचे "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी (अभियांत्रिकी)"]* **या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन आदेश क्र.रापोसे-०४२५/प्र.क्र.४३/पोल-१अ.**

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.

दिनांक : २९ मे २०२५.

**संदर्भ** : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या.-१२, दिनांक ०१/०८/२०१९.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७/०५/२०२१.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२/१०२०/नि.सू-२४-२५-DYSP-ACP/बि.सं.(अभि.)/१९४/२०२४, दि.२८.०४.२०२५

४) शासन पत्र, गृह विभाग, क्र.रापोसे-०४२५/प्र.क्र.४३/पोल-१अ, दिनांक २६.०५.२०२५

**शासन आदेश**

**"पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान विभाग"** *[पूर्वीचे "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी (अभियांत्रिकी)"]* या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या **"पोलीस निरीक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान विभाग"** *[पूर्वीचे "पोलीस निरीक्षक, बिनतारी (अभियांत्रिकी)"]* या संवर्गातील अधिका-यांच्या **"नियमित निवडसूची-२०२४-२५"** यामध्ये, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद पोलीस अधिका-यास, तात्पुरत्या स्वरुपात, पुढील अटींवर, पदोन्नती देण्यात येत असून त्यांची स्तंभ (४) मध्ये निर्दिष्ट पदावर, याद्वारे, पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र (१) | पोलीस अधिका-याचे नाव (श्री./श्रीम.) (२) | सध्याची नियुक्ती (३) | पदोन्नतीने पदस्थापना (४) |
|---|---|---|---|
| १. | रतन खंडेराव ढोकळे | अपर पोलीस महासंचालक व संचालक पोलीस दळणवळण माहिती तंत्रज्ञान व परिवहन, महाराष्ट्र राज्य, पुणे. | सहायक पोलीस आयुक्त, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्यवर्ती भांडार, संचालनालय, पुणे |

**अटी:-**

१) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७/०५/२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमाधीनतेचा *(regularization)* व सेवाज्येष्ठतेचा *(seniority)* कोणताही हक्क असणार नाही.

४) उक्त निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्याच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

२. हा शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने *[अनौपचारिक संदर्भ क्र.-/२०२५/का.-१२ (सेवा-३), दिनांक २३/०५/२०२५]* आणि पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांच्या शिफारशीचा यथायोग्य विचार करुन, महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न मध्ये निर्दिष्ट सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२९१७२७००४४२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP
GORAKHNATH
DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2025.05.29 17:28:15 +05'30'

**(संदीप गोरखनाथ ढाकणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) अपर पोलीस महासंचालक, पोलीस दळणवळण, माहिती तंत्रज्ञान व परिवहन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संबंधित पोलीस अधिकारी *(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्यामार्फत).*
३) निवड नस्ती, पोल-१अ.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.